**सन २०१८-१९ या वित्तीय वर्षासाठी समुपदेशन केंद्र या योजनेसाठी निधी वितरित करणेबाबत.**

# महाराष्ट्र शासन

## महिला व बाल विकास विभाग

## शासन निर्णय क्रमांक-समुप-२०१८/प्र.क्र.५४/का-१०

नविन प्रशासन भवन, तिसरा मजला,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
तारीख-०८ फेब्रुवारी, २०१९.

**वाचा :-**

१. शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र.अर्थसं-२०१८/प्र.क्र.६९/अर्थ-३, दि.०२ एप्रिल, २०१८.
२. शासन निर्णय समक्रमांक दि.२० ऑगस्ट, २०१८ व दि.३० ऑक्टोबर, २०१८.
३. शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र.अर्थसं-२०१८/प्र.क्र.६९/अर्थ-३, दि.२५ जानेवारी, २०१९.

**प्रस्तावना :-**

सन २०१८-१९ या वित्तीय वर्षासाठी २२३५-३१७७ या लेखाशिर्षाखाली ३१ सहायक अनुदाने (वेतनेतर) बाबीसाठी ₹१०,००,००,०००/- (अक्षरी रुपये दहा कोटी फक्त) इतकी तरतूद मंजूर आहे. २२३५-३१७७ या लेखाशिर्षाखालील वित्त विभागाच्या संदर्भाधीन परिपत्रकानुसार वेतनेत्तर बाबींसाठी उपलब्ध निधीपैकी संदर्भाधीन क्र.२ येथील दि.२० ऑगस्ट, २०१८ रोजीच्या शासन निर्णयान्वये उप आयुक्त (महिला विकास), महिला व बाल विकास आयुक्तालय, पुणे यांनी प्रस्तावित केल्याप्रमाणे समुपदेशक व समन्वयक यांच्या मानधनाकरिता ज्याप्रमाणे माहे एप्रिल, २०१८ ते जुलै, २०१८ या ४ महिन्यांचे मानधन अदा करण्याकरिता ₹१,२७,१२,०००/- (अक्षरी रुपये एक कोटी सत्तावीस लाख बारा हजार फक्त) इतका निधी वितरीत करण्यात आला होता. त्याचप्रमाणात माहे ऑगस्ट, २०१८ ते नोव्हेंबर, २०१८ या कालावधीतील समुपदेशक व समन्वयक यांच्या मानधनाकरिता ₹१,२७,१२,०००/- (अक्षरी रुपये एक कोटी सत्तावीस लाख बारा हजार फक्त) इतका निधी संदर्भाधीन क्र.२ येथील दि.३० ऑक्टोबर, २०१८ रोजीच्या शासन निर्णयान्वये समुपदेशन केंद्र योजनेसाठी वितरीत करण्यात आला आहे. २२३५-३१७७ या लेखाशिर्षाखालील वित्त विभागाच्या संदर्भाधीन परिपत्रकानुसार वेतनेत्तर बाबींसाठी उपलब्ध निधीपैकी उप आयुक्त (महिला विकास), महिला व बाल विकास आयुक्तालय, पुणे यांनी मागणी केल्याप्रमाणे ₹२,११,१०,०००/- (अक्षरी रुपये दोन कोटी अकरा लाख दहा हजार फक्त) इतका निधी समुपदेशन केंद्र योजनेसाठी वितरीत करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय :-**

सन २०१८-१९ या वित्तीय वर्षासाठी समुपदेशन केंद्र योजनेसाठी अर्थसंकल्पीय निधी ₹१०,००,००,०००/- (अक्षरी रुपये दहा कोटी फक्त) पैकी उर्वरीत निधीपैकी माहे मार्च, २०१९ अखेरपर्यंत समुपदेशक व समन्वयक यांच्या मानधनाकरिता तसेच संस्थांना द्यावयाच्या निधीकरिता **₹२,११,१०,०००/- (अक्षरी रुपये दोन कोटी अकरा लाख दहा हजार फक्त)** इतका निधी वितरीत करण्यास याव्दारे शासन मान्यता देण्यात येत आहे.

२. ₹२,११,१०,०००/- (अक्षरी रुपये दोन कोटी अकरा लाख दहा हजार फक्त) इतका निधी संबंधितांना अदा करण्यासाठी आयुक्त, महिला व बालविकास आयुक्तालय पुणे यांना प्राधिकृत करण्यात येत आहे. आयुक्त, महिला व बालविकास आयुक्तालय, पुणे यांनी वित्त विभागाच्या संदर्भाधीन दि.०२ एप्रिल, २०१८ व दि.२५ जानेवारी, २०१९ रोजीच्या परिपत्रकानुसार तसेच दि.०२ एप्रिल, २०१८ रोजीच्या परिपत्रकासोबतच्या परिशिष्टातील नमूद तपासणी सूचीतील अटींची तसेच परिच्छेद-७ मधील अटींची पुर्तता होत असल्याची खात्री करुन जिल्ह्यांना निधी वितरीत करावा. यापूर्वी संदर्भाधीन क्र.२ येथील शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात

आलेल्या उर्वरीत निधीचे तसेच वितरीत करण्यात येणाऱ्या निधीचे उपयोगिता प्रमाणपत्र शासनास सादर करण्याची दक्षता आयुक्त, महिला व बालविकास आयुक्तालय, पुणे यांनी घ्यावी.

३. सदर रक्कम मागणी क्र.एक्स-१, कार्यक्रम, २२३५, सामाजिक सुरक्षा व कल्याण ०२ समाजकल्याण १०३, महिला कल्याण (२१) (०१) महिलांकरिता समुपदेशन केंद्रे (कार्यक्रम), (२२३५ ३१७७), ३१ सहायक अनुदाने (वेतनेतर) या लेखाशीर्षाखाली सन २०१८-१९ मध्ये उपलब्ध करुन देण्यात आलेल्या तरतूदीतून खर्च करण्यात यावी.

४. वित्त विभागाच्या दि.०२ एप्रिल, २०१८ रोजीच्या परिपत्रकानुसार सदर परिपत्रकासोबतच्या परिशिष्टातील नमूद तपासणी सूचीतील अटींची तसेच परिच्छेद-७ मधील अटींची पुर्तता होत असल्याने विभागाच्या स्तरावर सदर निधी वितरित करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

५. हा शासन निर्णय वित्त विभाग, परिपत्रक दि.०२ एप्रिल, २०१८ व दि.२५ जानेवारी, २०१९ अन्वये त्या विभागाने दिलेल्या सहमतीस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०१९०२१२१६३०२७९८३० असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Smita Dattatray Nivatkar

Digitally signed by Smita Dattatray Nivatkar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Women and Child Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=3fa46cf1e928518ffc98619187a1ef6de2dd57c16934e9cb6672cc02aa258b08, serialNumber=f9bd2a7c214922f8f4939e80711ece461c9dfd9c679b28f98e79475c5ea90e21, cn=Smita Dattatray Nivatkar
Date: 2019.02.12 16:32:11 +05'30'

( स्मिता निवतकर )
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. आयुक्त, महिला व बाल विकास आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
२. महालेखापाल- महाराष्ट्र-१/२ (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई / नागपूर
३. महालेखापाल- महाराष्ट्र-१/२ (लेखा परिक्षा), मुंबई / नागपूर
४. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
५. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई
६. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
७. जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी, मुंबई उपनगर
८. नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई
९. वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
१०. कक्ष अधिकारी (का.४), महिला व बाल विकास विभाग, मंत्रालय, मुंबई यांना सदर तरतूद बी.डी.एस. प्रणालीवर उपलब्ध करुन देण्याच्या विनंतीसह अग्रेषित.
११. निवड नस्ती, का-१०.